मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल करावयाच्या याचिकेसंबंधित सूचना.

**महाराष्ट्र शासन**

**विधी व न्याय विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२८१५/प्र.क्र.१५१ /१५/का.८**

मादाम कामा रोड, मुख्य इमारत, पाचवा मजला,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ८/१०/२०१५.

## परिपत्रक

सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली या कार्यालयाद्वारे मा. सर्वोच्च न्यायालयात महाराष्ट्र शासनाच्या वतीने विविध प्रशासकीय विभागांतर्गत दिवाणी व फौजदारी प्रकरणांमध्ये विशेष अनुमती याचिका (SLP) व दिवाणी/फौजदारी अपील दाखल करण्यात येतात.

सर्व सरकारी वकीलांनी मा. सर्वोच्च न्यायालयात याचिका दाखल करतेवेळी होणारा विलंब टाळण्यासाठी खालील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१) मा. न्यायालयाने पारीत केलेल आदेश/निर्देश तात्काळ संबंधित कार्यालय प्रमुख/विभाग प्रमुख यांच्या निदर्शनास आणावेत.

२) मा. न्यायालयाने पारीत केलेल्या आदेशाची/निर्देशाची प्रमाणित प्रत प्राप्त करण्यासाठी त्याच दिवशी अर्ज करावा व प्रमाणित प्रत तात्काळ मिळवून संबंधित कार्यालयास उपलब्ध करून देण्यात यावी.

३) मा. न्यायालयाच्या आदेश/निर्देशामध्ये अपील/विशेष अनुमती याचिका दाखल करण्याजोगा मुद्दा आहे किंवा कसे हे तपासून पहावे व याबाबत आपले अभिप्राय संबंधित विभागास तात्काळ कळवावेत.

४) सर्व सरकारी वकील कार्यालयांनी विलंब टाळण्यासाठी माहिती तंत्रज्ञानाच्या अद्ययावत सुविधांचा वापर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००८१५३११४०३१२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

N J Jamadar

Digitally signed by N J Jamadar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Secretary And Senior Legal Advisor, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc1a04c87922c611cd86db0417549c441857561c576c21b21f3c8d180884505e, cn=N J Jamadar
Date: 2015.10.08 15:32:24 +05'30'

**( एन. जे. जमादार )**

प्रधान सचिव व विधि परामर्शी

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई.
२. प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
३. सर्व मंत्रालयीन विभाग.
४. सरकारी वकील, सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली.
५. निवडनस्ती.